# <u>महाराष्ट्र शासन</u>

नस्ती क्र.अविवि-२०२२/प्र.क्र.३०/का.०७,
अल्पसंख्याक विकास विभाग,
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दि. २६/०४/२०२२

**<u>विषय</u> :- प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमातंर्गत (PMJVK), मौजा शिवापूर, जि.अकोला येथे १०० खाटांचे उप जिल्हा रुग्णालय बांधकामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

<u>संदर्भ :-</u>

१. अवर सचिव, अल्पसंख्याक कार्य मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली यांचे पत्र क्र. MsDP-१३/६२/२०२०-MsDP-MOMA, दि १२/०१/२०२१.
२. अवर सचिव, अल्पसंख्याक कार्य मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली यांचे पत्र क्र. MsDP-१३/७/२०२१-MsDP-MOMA, दि ०१/०२/२०२१.
३. प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग यांचे पत्र.क्र.Misc: २०२०/C.R.३७, Arogya-३,दि. २६/०२/२०२०.
४. शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्र. अ. वि. वि. २०२० / प्र.क्र.१९ / का-७, दि.२२/०३/२०२१.

<u>ज्ञापन:-</u>

केंद्र शासनाच्या अल्पसंख्याक कार्य मंत्रालयाच्या प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमांतर्गत (PMJVK) गठित शक्तिप्रदान समितीने दि. २८/१२/२०२० रोजी झालेल्या ३० व्या बैठकीत मौजा शिवापूर, जि. अकोला येथे अल्पसंख्याक समाजासाठी १०० खाटांचे उप जिल्हा रुग्णालय बांधकामाच्या रु.४६१२.७८/- लाख इतक्या प्रस्तावास मान्यता दिली असल्याचे संदर्भाधिन क्र. (२) अन्वये कळविण्यात आले आहे. सदर प्रस्तावात केंद्र : राज्य हिस्सा हा ६०:४० असून यामधे केंद्र शासनाचा एकूण हिस्सा रु.२७६७.७/- लाख व राज्य शासनाचा एकूण हिस्सा रु.१८४५.१/- लाख इतका आहे.

२. केंद्र शासनाने रुग्णालय बांधकामास दिलेल्या मान्यतेचा तपशील खालीलप्रमाणे आहे:-

**(रु. लाखात)**

| अ क्र | प्रकल्पाचे नाव | युनिट ची संख्या | हिश्श्या चे प्रमाण | केंद्र शासनाच्या मान्यते नुसार प्रती युनिट खर्च | केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा | एकूण |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | मौजा शिवापूर जि. अकोला येथे १०० खाटांचे उप जिल्हा रुग्णालयाचे बांधकाम करणे. | ०१ | ६०:४० | ४६१२.७८ | २७६७.७ | १८४५.१ | ४६१२.७८ |
| | **एकूण** | **०१** | **६०:४०** | **४६१२.७८** | **२७६७.७** | **१८४५.१** | **४६१२.७८** |

केंद्र शासनाने दिलेल्या मान्यतेस अनुसरुन तसेच सार्वजनिक बांधकाम विभागाच्या उच्चाधिकार सचिव समितीच्या मान्यतेस अनुसरुन मौजा शिवापूर जि. अकोला येथे १०० खाटांचे जिल्हा रुग्णालय बांधकामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन ज्ञापन :-**

संचालक, आरोग्य संचालनालय यांनी मौजा शिवापूर, जि. अकोला येथे अल्पसंख्याकांसाठी १०० खाटांचे उप जिल्हा रुग्णालय बांधकामासाठी संदर्भ क्र. (३) अन्वये रू.४६१२.७८/- लाख इतक्या किंमतीचा प्रस्ताव सादर केला आहे. केंद्र शासनाने प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमांतर्गत मौजा शिवापूर जि. अकोला येथे रु.४६१२.७८ लाख इतक्या किंमतीच्या रुग्णालय बांधकामाच्या प्रस्तावास मान्यता दिली आहे. केंद्र शासनाने दिलेल्या मान्यतेनुसार मौजा शिवापूर जि.अकोला येथे १०० खाटांचे उप जिल्हा रुग्णालय बांधकाम करण्यासाठी सोबत जोडलेल्या **परिशिष्ट " अ"** मध्ये दर्शविल्या प्रमाणे एकूण रु.४६१२.७८/- लाख (रुपये सेहचाळीस कोटी बारा लाख अठ्ठ्यात्तर हजार फ़क्त) इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रकास खालील अटींच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.:-

<u>२. अटी व शर्ती</u>

१. रुग्णालय बांधकामाच्या सविस्तर अंदाजपत्रकास सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सक्षम प्राधिकाऱ्याची तांत्रिक मंजुरी प्राप्त करुन घ्यावी.

२. रुग्णालय बांधकाम हे सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सक्षम प्राधिकाऱ्याने सविस्तर अंदाजपत्रकास दिलेल्या तांत्रिक मंजूरीनुसार करण्यात यावे.

३. रुग्णालय बांधकाम करण्यासाठी आवश्यक त्या बाबींची त्वरेने पूर्तता करुन घ्यावी आणि यासाठी शासन निकषानुसार निविदा प्रक्रिया करुन कामास तात्काळ सुरुवात करावी व तसे शासनास अवगत करावे.

४. काम सुरु करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करुन घ्यावी.

५. केंद्र शासनाने दिलेल्या मान्यतेनुसार ०१ जिल्हा रुग्णालय बांधकामासाठी केंद्र + राज्य हिस्सा अनुक्रमे ६०:४० असा आहे. बांधकामासाठी प्राप्त होणा-या केंद्र व राज्य हिश्यातील रकमेच्या विनियोगाबाबतची स्वतंत्र उपयोगिता प्रमाणपत्रे त्रैमासिक प्रगती अहवाल (QPR) विहीत नमुन्यात (अद्यावत छायाचित्रांसह) शासनास सादर करावा.

६. रुग्णालय बांधकामाच्या अंदाजपत्रकातील मुख्य इमारत बांधकामाव्यतिरिक्त "इतर अनुषंगीक बाबीच्या" अंदाजपत्रकास सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सक्षम प्राधिकाऱ्याची तांत्रिक मंजुरी तसेच प्रत्यक्ष निधी प्राप्त झाल्याशिवाय कामास सुरुवात करु नये.

७. रुग्णालय बांधकामासाठी दुसऱ्या टप्प्यातील निधीची मागणी करताना पहिल्या टप्प्यात प्राप्त सर्व निधीच्या वापराबाबतची विहित नमुन्यातील उपयोगिता प्रमाणपत्रे, त्रैमासिक प्रगती अहवाल (अद्यावत छायाचित्रांसह) प्रस्तावासोबत शासनास सादर करावीत.

८. सदरचे काम नवीन नकाशाप्रमाणे करावयाचे असल्यास सार्वजनिक आरोग्य विभागाने नियुक्त केलेल्या खाजगी वास्तुशास्त्रज्ञा मार्फ़त नकाशांप्रमाणे वास्तुमांडणी आराखडा मंजूर करुन घेण्यात यावा. तसेच स्थानिक ग्रामिण नगर विकास संस्थेच्या संबंधित नियमानुसार बांधकाम परवानगी तसेच भोगवटा प्रमाणपत्र मिळविण्याची जबाबदारी नवनियुक्त वास्तुशास्त्रज्ञ व जिल्हा शल्य चिकित्सक यांची राहिल. तसेच ही परवानगी मागण्यासाठीचा पत्रव्यवहार जिल्हा शल्यचिकित्सक यांच्या स्वाक्षरीने करण्यात यावा.

९. सार्वजनिक बांधकाम विभागाच्या मुख्य उपमुख्य वास्तुशास्त्रज्ञांकडून या कामाचे नकाशे व वास्तुमांडणी आराखड्यांना वेगळ्या मंजूरीची आवश्यता नाही.

१०. उरोक्त काम मंजूर रकमेत पूर्ण होईल याची व सदर कामास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याची आवश्यकता लागणार नाही याची विशेष दक्षता घेण्यात यावी.

११. प्रस्तावित करण्यात आलेल्या इमारतीचे जोते क्षेत्रफ़ळ कर्मचारीवर्ग यांच्या अनुज्ञेय मानकाप्रमाणे असल्याची खातरजमा करण्यात यावी.

१२. प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग सन निर्णय क्र. इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/तां.क.१, दि.१० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

१३. प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रम अंतर्गत मिळणाऱ्या अनुदानातून पूर्ण केलेल्या कामाच्या ठिकाणी प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रम (PMJVK) अल्पसंख्याक कार्य मंत्रालय भारत सरकार अशा आशयाचा फ़लक तसेच काम पूर्ण होण्यास लागणारा कालावधी ,अंमलबजावणी करणाऱ्या संस्थेचे नाव,प्रस्तावित विकास कामास मान्यता मिळालेला दिनांक,काम पूर्ण होण्याचा दिनांक आणि प्रस्तावित विकास कामाचा अंदाजित खर्च इत्यादिंचा तपशील प्रस्तावित कामाच्या ठिकाणी ठळकपणे निदर्शनास येईल अशा पद्धतीने लावावा.

३. केंद्र शासनाच्या मान्यतेनुसार रुग्णालय बांधकामातंर्गत केंद्र हिश्श्यावर होणारा खर्च “मागणी क्रमांक झेडई-१, २२३५ - सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २०० - इतर कार्यक्रम, केंद्र पुरस्कृत योजना (००) (१७) अल्पसंख्याक बहुल क्षेत्रासाठी प्रधानमंत्री न विकास कार्क्रम (केंद्र हिस्सा) (कार्यक्रम) (२२३५ ए ५४३), ३१ - सहाय्यक अनुदान (वेतनेतर)” तसेच राज्य हिश्श्यावर होणारा खर्च “मागणी क्रमांक झेडई-१,२२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २०० - इतर कार्यक्रम, केंद्र पुरस्कृत योजना (०१)(१४) प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रम (राज्य हिस्सा) (कार्यक्रम) (२२३५ ए २३१) ३१- सहाय्यक अनुदान (वेतनेतर)” या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

४. प्रस्तुत शासन ज्ञापन, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला, उपविभाग पाच अ.क्र.१, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तिकेतील परिच्छेद क्र. १३४ खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. प्रस्तुत शासन ज्ञापन, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतसथळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेताक २०२२०४२७११०३४१०४१४ असा आहे. हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SHASHANK YASHWANT BARVE

Digitally signed by SHASHANK YASHWANT BARVE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MINORITIES DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=4f19736b62993d2c7e716a76cdcfdaa8a6a08fc2f15bfd41fed42ec7306bf1e8, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8899737770E99850C69D3C24802DB93159DBFB4895232F27476708A6643A2AE7, cn=SHASHANK YASHWANT BARVE
Date: 2022.04.27 11:06:07 +05'30'

**( शशांक य. बर्वे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. अपर मुख्य सचिव,सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय मुंबई-३२.
२. प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय मुंबई-३२.
३. विभागीय आयुक्त, अमरावती.
४. आयुक्त (आरोग्य सेवा) तथा संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान,मुंबई.
५. संचालक-१, आरोग्य सेवा, मुंबई.
६. संनियंत्रक तथा मुख्य अभियंता,सार्वजनिक बांधकाम विभाग,अमरावती.
७. अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, अमरावती.
८. सह संचालक,आरोग्य सेवा (रुग्णालय राज्यस्तर), मुंबई.

९. उपसंचालक, आरोग्य सेवा मंडळ, अकोला.

१०. वैद्यकीय अधिक्षक, उप जिल्हा रुग्णालय, शिवापूर, जि. अकोला..

११. कार्यकारी अभियंता,सार्वजनिक बांधकाम मंडळ, शिवापूर, जि. अकोला..

१२. जिल्हा कोषागार अधिकारी, जि. अकोला.

# प्रपत्र "अ"

| | | | | |
|---|---|---|---|---|
| **PROPOSED CONSTRUCTION OF 100 BEDED DISTRICT HOSPITAL AT MOUZA SHIVAPUR DISTRICT AKOLA** | | | | |
| **RECAPUTILATION SHEET** | | | | |
| | **( A)** | | | |
| | | | **Estimate** | **Administrative Approval** |
| | Cost of Building | | 282688043 | **282787294** |
| | **Total (A)** | | **282688043** | **282787294** |
| | **(B)** | | | |
| 1 | Add compound wall 376.0 Rmt .11000/Rmt | | 4137000 | 4137000 |
| 2 | Add 11% for electrification (on A) | | 31095685 | 31095685 |
| 3 | Add 5% for water supply& sanitization (on A) | | 14134402 | 14134402 |
| 4 | Add 9% for furniture (on A) | | 25441924 | 25441924 |
| 5 | Add 2% for Fire fighting (on A) | | 5653761 | 5653761 |
| 6 | Add1% for solar system back up (on A) | | 2826880 | 2826880 |
| 7 | Add 1% for Rain water Harvesting(on A) | | 2826880 | 2826880 |
| 8 | Add 5% formedical Gas pipeline(on A) | | 14134402 | 14134402 |
| 9 | Add2% for AC work (on A) | | 5653761 | 5653761 |
| 10 | Add 3% for lift | | 8480641 | 8480641 |
| 11 | Add 1.0% for Land scaping (on A) | | 2826880 | 2826880 |
| | **Total (B)** | | **117212217** | **117212217** |
| | **Total ( A+B)** | | **399900260** | **399999511** |
| | **(C)** | | | |
| | Add 12%GST charges on (A+B) extra as per Govt. of India circular | | 47988031 | 47988031 |
| | Add 1%for contingency on (A+B) | | 3900000 | 3900000 |
| | Add 1.99% for Architecturalservices (A+B) | | 7958015 | 7958015 |
| | Add18% GST on Architectural services | | 1432443 | 1432443 |
| | **Total(C)** | | **61278489** | **61278489** |
| | **Total (A+B+C)** | | **461178749** | **461278000** |
| | **Net Total say Rs.** | | **461178749** | **461278000** |
| | **Say Rs.** | | **461200000** | **461278000** |